राज्यातील पाटबंधारे प्रकल्पांमुळे बाधित झालेल्या प्रकल्पग्रस्तांना पर्यायी जमिन वाटप करणेबाबत मार्गदर्शक सुचना.....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: आरपीए - २०२१/प्र.क्र.१३६/र-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १४.१०.२०२१

**संदर्भ**:- शासनाचे पत्र क्र. बैठक/२०२०/प्र.क्र.४५/र-३, दिनांक २३.०८.२०२१

## परिपत्रक

दिनांक ०१.०४.२०२१ रोजी मा. मंत्री (मदत व पुनर्वसन) महोदयांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकी मध्ये शासनाच्या पूर्व परवानगी शिवाय पर्यायी जमिनीचे वाटप करण्यात येऊ नये, असे निर्देश देण्यात आले होते. या बैठकीचे इतिवृत्त संदर्भाधिन दिनांक २३.०८.२०२१ रोजीच्या पत्रान्वये निर्गमीत करण्यात आले होते.

याबाबत क्षेत्रिय स्तरावरुन विचारणा करण्यात येत असल्याने प्रकल्पग्रस्तांना पर्यायी जमिन वाटप करण्याबाबत खालीलप्रमाणे सविस्तर सुचना निर्गमीत करण्यात येत आहे.

१. प्रकल्पातील पात्र प्रकल्पग्रस्तांना पर्यायी जमिनी वाटप करतांना प्रकल्पाच्या लाभक्षेत्रात राखीव ठेवण्यात आलेल्या व अधिसुचीत केलेल्या आराखड्यामधील जमिन वाटप करण्यास पुनर्वसन अधिनियमानुसार जिल्हा स्तरावर कार्यवाही करण्यात यावी. जिल्हाधिकारी यांनी पात्र प्रकल्पग्रस्तांना वाटप केलेल्या जमिनी संबंधि तपशिलवार माहीती व आदेश दर महिन्याच्या ५ तारखेस सोबत जोडलेल्या **“प्रपत्र अ”** मध्ये शासनास सादर करावी.
२. प्रकल्पातील बाधित होणाऱ्या प्रकल्पग्रस्तांना गावनिहाय आराखडा निश्चित करण्यात आलेला आहे. प्रकल्पग्रस्तांना पर्यायी जमिन वाटप करताना गावातील आराखड्यात बदल होत असल्यास सदरचे क्षेत्र वाटप करतांना शासनाची पूर्वमान्यता घेण्यात यावी.
३. पात्र प्रकल्पग्रस्तांना लाभक्षेत्र नसलेल्या प्रकल्पातील तसेच लाभक्षेत्र असलेल्या प्रकल्पातील वाटपासाठी अधिसुचीत केलेल्या आराखड्याबाहेरील पर्यायी जमिन वाटपापूर्वी शासनाची पूर्व परवानगी घेण्यात यावी.
४. आराखड्याबाहेरील पर्यायी जमिन मंजुर करण्याबाबतचे प्रस्ताव शासनास सादर करतांना योग्य कारणमिमांसा, प्रकल्पग्रस्तांना वाटपासाठी उपलब्ध क्षेत्र, प्रकल्पग्रस्तांची पात्रता, मुळ प्रकल्पग्रस्तांचे वारस, मंजुर करावयाच्या पर्यायी जमिनीच्या कब्जेहक्काची रक्कम शासनजमा असलेल्या ठेवीबाबत, प्रकल्पग्रस्तांना संपादन व कुटुंब संख्येनुसार देय क्षेत्र इत्यादी मुद्यांबाबत तपासणी करुन सविस्तर प्रस्ताव शासनास सादर करण्यात यावेत.

**५.** प्रकल्पग्रस्तांनी पूर्वी वाटप केलेल्या जमिनी बदलुन मिळणेबाबत विनंती केल्यास याबाबतचे प्रस्ताव योग्य कारणमिमांसेसह शासनास सादर करण्यात यावेत.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असुन त्याचा सांकेतांक क्रमांक २०२११०१४१७१३१६७९१९ असा आहे. हे परीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नावाने.

KHATALE GANESH TUKARAM

Digitally signed by KHATALE GANESH TUKARAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6d297056650ba782c82ae82002633d7957c9b8ca77baaaab2baf759e684e202f, pseudonym=74B8388710AFF985067325F80A5D1E13188FE94B, serialNumber=A31A9595B748752B50EA2D029326724E644B1CE230DFF9D16AB951C1AB20C6A5, cn=KHATALE GANESH TUKARAM
Date: 2021.10.14 18:15:43 +05'30'

**( गणेश खताळे )**
**कक्ष अधिकारी, महसुल व वन विभाग.**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा.मंत्री, मदत व पुनर्वसन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) सचिव ( मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
५) सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
७) महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर,
८) सर्व विभागीय आयुक्त,
९) सव जिल्हाधिकारी,
१०) सर्व जिल्हा पुनर्वसन अधिकारी,
११) सर्व कार्यासन (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२) निवड नस्ती, कार्यासन र-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय. मुंबई.

प्रपत्र - अ

| पाटबंधारे प्रकल्पाचे नाव | प्रकल्पग्रस्ताचे नाव व ज्या पाटबंधारे प्रकल्पाकरिता त्याची जमिन संपादित करण्यात आली आहे त्या प्रकल्पाचे नाव | प्रकल्पबाधित व्यक्तीस देय असलेल्या पर्यायी जमिनीचे क्षेत्र | प्रकल्पबाधित व्यक्तीस प्रत्यक्षात वाटप केलेल्या पर्यायी जमिनीचे क्षेत्र | प्रकल्पबाधित व्यक्तीस पर्यायी जमिनीचे वाटप केलेल्या बाबतच्या आदेशाचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| | | | | |
| | | | | |